**शैक्षणिक वर्ष २०१७-१८:**
**आस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये नवीन अतिरिक्त तुकड्या सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एनजीसी-२०१७/(१०२/१७)/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
**दिनांक : ०७ जुलै, २०१७.**

**संदर्भ :** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
क्र. एनजीसी-२०१०/(१९३/१०)/ मशि-४, दि. ३०.१०.२०१०.

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
क्र. एनजीसी- २०१२/(२४७/१२)/मशि-४, दि. ०२.०९.२०१३.

## शासन निर्णय

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ व ८३ आणि संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषी विद्यापीठांनी शै.व. २०१७-१८ साठी नवीन अतिरिक्त तुकड्यांचे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे सादर केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये छाननी करण्यात आली. विद्यापीठांच्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन स्तरावर केलेली छाननी व महाविद्यालयाने नॅक मुल्यांकनासाठी केलेला अर्ज व त्या अनुषंगाने प्राप्त LOI ( Letter of Intent) विचारात घेऊन पात्र ठरलेल्या तसेच, महाविद्यालयाने केलेली त्रुटींची पुर्तता लक्षात घेऊन, महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमुद केल्यानुसार नवीन अतिरिक्त तुकडीस खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून **कायम विनाअनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे : -

| अ. क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | संस्था/महाविद्यालयाने मागणी केलेली अतिरिक्त तुकडी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | शुर्परका एज्यूकेशनल अॅन्ड मेडीकल ट्रस्टचे एम.बी.हॅरीस कॉलेज ऑफ आर्टस, ए. ई. कालसेकर कॉलेज ऑफ कॉमर्स अॅन्ड मॅनेजमेंट नवायत नगर,पो. ओ. सोपारा (प), ता वसई, जि. पालघर-४०१२०३ | **बी.कॉम.** (२४०-३६०) **बी.एम.एस.** (६०-१२०) |

**अटी व शर्ती:-**

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात अतिरिक्त तुकड्या मंजूर करण्यात आलेले आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
२. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
३. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी ३० ऑगस्टपर्यंत करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.
४. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.
५. यु.जी.सी. (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन-२००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित केलेल्या निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधीत महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.
६. संबंधित विद्यापीठांनी वरील विवरणपत्रातील महाविद्यालयांनी प्रकरणपरत्वे नॅक मुल्यांकन/पुनर्मुल्यांकन प्राप्त करुन घेण्यासाठी पाठपुरावा करावा.

२. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

३. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी नवीन अतिरिक्त तुकडयांबाबत नियतकालिक आढावा घेवून सदर अतिरिक्त तुकडयांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अतिरिक्त तुकडयांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर, खंडपीठ नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्र. २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता, या अटींसंदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७१७१०२११७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Vasantrao kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao kharke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff0592182712342 6ec3977a7476478ce183be979d, cn=Dattatray Vasantrao kharke
Date: 2017.07.07 18:02:36 +05'30'

**(द.व. खारके)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई.
४) संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५) निवडनस्ती (मशि-४)